**बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना व**
**लोकसेवा केंद्रांना विविध सवलती देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ०९/०२/प्र.क्र.४९१/इमारती २
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २१ जून, २००३.

**वाचा** - शासन निर्णय रोजगार व स्वयंरोजगार विभाग क्र. रोस्वरो
२००२/प्र.क्र.२६७/रोस्वर-१, दिनांक :- १७ ऑगस्ट, २००२.

**पार्श्वभूमी** -

शासनाने ऑक्टोबर २००० मध्ये रोजगार व स्वयंरोजगार कार्यक्रमाविषयी सर्वसमावेशक व सर्वस्पर्शी धोरण जाहिर केले आहे. वाढते संगणकीकरण व आधुनिकीकरण आणि यांत्रिकीकरण यामुळे पारंपारिक/औपचारिक स्वरुपातील नोकऱ्या/रोजगार कमी प्रमाणात उपलब्ध होत असल्यामुळे शासनाने पंजीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना व लोकसेवा केंद्रांना विविध सवलती देण्याचे व त्यांना आर्थिकदृष्टया बळकट करण्याचे धोरण आखलेले आहे. या धोरणाच्या अंमलबजावणीसाठी शासनाने सर्व विभागांच्या सहमतीने वर उल्लेखिलेला शासन निर्णय निर्गमित केलेला आहे. या शासन निर्णयानुसार सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत उक्त संस्थांना कोणत्या सवलती देता येतील याचा विचार शासन स्तरावर सुरु होता. त्या अनुषंगाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

२. पंजीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था तसेच लोकसेवा केंद्राद्वारे सार्वजनिक बाधकाम विभागाच्या कार्यालयांसाठी उपलब्ध करुन द्यावयाच्या सेवा, मालाचा/वस्तूचा पुरवठा व कामे देण्याच्या संदर्भात व अन्य बाबतीत खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

**१. दैनंदिन कामाच्या सेवा बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था तसेच लोकसेवा केंद्रामार्फत करणेबाबत :-**

बेरोजगारांच्या सहकारी सेवा संस्थांना आणि लोकसेवा केंद्रांना स्वबळावर कार्यरत होण्याकरीता, शासनाच्या सार्वजनिक बांधकाम विभागामधील दैनंदिन व्यवहाराची कामे व विविध प्रकारच्या सेवा, त्यांच्या कुवतीनुसार करून घेणे शक्य आहे अशी खालील प्रकारची किरकोळ स्वरूपाची कामे करणेत यावीत.

१) कार्यालयीन तसेच शासकीय निवासस्थानाची दैनंदिन साफसफाई, स्वच्छता इ. प्रकरची कामे.
२) कार्यालयीन रेकॉर्ड लावणे.
३) रखवालदार, लिफ्टमनची कामे
४) टंकलेखन, बायडिंग इत्यादी कामे
५) प्लंबिंग काम, सुतार काम, वेतकाम
६) किरकोळ स्वरुपाची विद्युत कामे (भारतीय विद्युत कायद्यातील तरतुदींस बाधा न आणता)

७) वरील प्रकारात न बसणारी परंतु अशी संकीर्ण कामे की जी करण्यास सदर बेरोजगारांची सेवा सहकारी संस्था तसेच लोकसेवा केंद्र सक्षम आहे अशी कार्यकारी अभियंता यांची खात्री आहे. (ही खात्री पटल्याची कारणे कार्यकारी अभियंता यांनी अभिलेख्यात नोंदवावीत.)

क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी, अशा प्रकारची दैनंदिन व्यवहाराच्या कामांची यादी तयार करुन (विधीमंडळ अधिवेशन व आमदार निवासातील सेवा वगळून) ती कामे बेरोजगार सेवा, सहकारी संस्था किंवा लोकसेवा केंद्रांमार्फत करुन घेण्याची कार्यवाही करावी व तसेच ही सर्व कामे करुन घेत असताना प्रचलित औद्योगिक विवाद कायदा, कामगार कायदा इ. तत्सम कायद्यातील तरतुदींचे उल्लंघन होणार नाही व शासनास कोणत्याही प्रकारे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही प्रकारचा भूर्दंड पडणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. या सहकारी संस्थांशी कारारपत्र करीत असताना अशा मुद्यांकडे विशेष लक्ष पुरविणे आवश्यक आहे.

**२. सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत विविध कार्यालयासाठी लागणाऱ्या विविध वस्तू व मालाचे आरक्षण :-**

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत खरेदी करण्यात येणाऱ्या मालांचे वर्गीकरण करुन ज्या मालाचे उत्पादनाकरीता उच्च तंत्रज्ञानाची गरज नाही अशा मालांची/वस्तूंची यादी तयार करण्यात यावी. या वस्तू किंवा मालाची खरेदी करताना बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांकडून किमान २५ टक्के आणि महिलांच्या बचत गटामार्फत किमान २५ टक्के या प्रमाणात वस्तूंची खरेदी करण्यात यावी. याकरीता क्षेत्रीय कार्यालयांनी वस्तूंच्या किंमतीचे दरपत्रक किंवा सेवा दरपत्रक प्रचलित बाजारभावाप्रमाणे निश्चित करावे. बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांमध्ये परस्परांत स्पर्धा होऊन त्याचप्रमाणे बचत गटामध्येही परस्परात स्पर्धा होऊन कमी किंमतीत उत्कृष्ट दर्जाच्या वस्तू प्राप्त होतील यासाठी प्रयत्न करण्यात यावा. सदर खरेदी करताना स्थानिक बाजारपेठेत त्या वस्तू ज्या किंमतीत उपलब्ध आहेत त्यापेक्षा कमी किंमतीत त्या उपलब्ध होतील व त्याचा दर्जा उत्कृष्ट राहील हे पहाणे गरजेचे आहे. या दृष्टीकोनातून अशा कार्यालयीन वस्तूंचे दर निश्चित करण्यात यावे.

३. **बेरोजगाराच्या सेवा सहकारी संस्थाना तसेच लोकसेवा केंद्राना अनामत रक्कम भरणेतून सूट. :-**

वस्तुंच्या/मालांची खरेदी व सेवेचा पुरवठा, याकरीता निविदा भरताना अनामत रक्कम भरण्याच्या अटीतून पंजीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना/लोकसेवा केंद्रांना सूट देण्यात यावी.

**४. बेरोजगार अभियंत्यांच्या सहकारी संस्थांना विना स्पर्धा कामे देण्याबाबत.**

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत बेरोजगार स्थापत्य/विद्युत अभियंत्यांना विनास्पर्धा अंदाजपत्रकाच्या दराने काम देण्याबाबतचे आदेश निर्गमित केले आहेत. हे आदेश त्याच अटी व शर्तीच्या अधीन राहून बेरोजगार स्थापत्य/विद्युत अभियंत्यांच्या पंजीकृत सहकारी संस्थांना लागू करण्यात यावेत. याबाबतची काम वाटपाची पध्दत खालीलप्रमाणे राहतील :-

**अ - अटी** -

१) संबंधित पंजीकृत सहकारी संस्थांचे सर्व सदस्य अभियंते व महाराष्ट्रातील मूळ रहिवाशी असावेत.

२) या सर्व सदस्य अभियंत्यांनी महाराष्ट्रातील किंवा राज्याबाहेरील अभियांत्रिकी महाविद्यालयातून वा महाराष्ट्र राज्याच्या किंवा इतर राज्याच्या तांत्रिक शिक्षण संचालकांनी मान्यता दिलेल्या तांत्रिक संस्थांमधून पदवी/पदविका, संबंधित सहकारी संस्था ज्या दिनांकास नोंदणीकृत होईल त्या दिनांकापूर्वी दहा वर्षाचे आत प्राप्त केलेली असावी.

३) अभियंत्यांच्या सहकारी संस्थेतील बेरोजगार अभियंता सभासद नोंदणीकृत कंत्राटदार नसावा व त्यांनी विनास्पर्धा लॉटरी पध्दतीने काम मिळविलेले असू नये. तथापि, काही बेरोजगार अभियंते वैयक्तिक नांवाने

कंत्राटदार म्हणून नोंदणीकृत असून ही बेरोजगार अभियंत्याच्या सहकारी संस्थेत सभासद असल्यास, त्यांची वैयक्तिक कंत्राटदार नोंदणी रद्द करावी व त्यांनी बेरोजगार अभियंता कंत्राटदार म्हणून विनास्पर्धा लॉटरी पध्दतीने मिळालेल्या कामाची रक्कम बेरोजगार अभियंतांच्या सहकारी संस्थेस विना स्पर्धा द्यावयाच्या कामांच्या रू.३० लक्ष रकमेतून वजा करून उर्वरित रकमेपर्यंतच्या कामाचे वाटप सदर संस्थेस करण्यात यावेत.

४) बेरोजगार अभियंत्यांच्या पंजीकृत सहकारी संस्थेस कंत्राटदार म्हणून स्थापत्य कामासाठी "वर्ग ६" व विद्युत कामासाठी वर्ग "ड" मध्ये नोंदणी विहित पध्दतीनुसार करण्यात यावी.

५) नोंदणीकृत बेरोजगार अभियंत्यांच्या पंजीकृत सहकारी संस्थेने कामे मिळण्यासाठी सा.बां.विभागाच्या संबंधित अधीक्षक अभियंता /कार्यकारी अभियंत्यांकडे अर्ज करावेत व सदर संस्थाना सार्वजनिक बांधकाम विभागाने नोंदणीकृत बेरोजगार अभियंत्यांना वैयक्तिकरित्या विनास्पर्धा कामे वाटपाकरिता गठीत केलेल्या जिल्हावार समितीमार्फत कामाच्या उपलब्धतेनुसार लॉटरी पध्दतीने (चिठ्ठया टाकून) कामाचे वाटप करण्यात येईल.

६) लॉटरीने काढलेले काम अभियंत्यांच्या सहकारी संस्थेस नको असेल तर त्यांना आणखी दोन वेळा लॉटरीत भाग घेता येईल. जर अशा रीतीने एकूण तीन वेळा त्याच किंवा नंतरच्या बैठकीत लॉटरीने काढलेले काम संस्थेने नाकारले तर मात्र त्यांना या प्रकारे विना स्पर्धा काम मिळणार नाही.

७) बेरोजगार अभियंत्यांप्रमाणे त्यांच्या पंजीकृत सहकारी संस्था हया जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रात नाव नोंदणी केलेल्या असाव्या.

८) ज्या संस्था स्वतःच्या नांवावर कामे घेऊन इतरांना कामे देतील किंवा कामे सोडून देतील त्यांची नांवे नोंदणीकृत यादीतून रद्द करण्यात येतील.

**ब) सवलती -**

१) अभियंत्यांच्या सहकारी संस्थांना कोणत्याही निविदेसाठी बयाणा रक्कम भरण्याची सूट देण्यात यावी.

२) नियमाप्रमाणे ठरवून देण्यात आलेल्या अनामत रकमेच्या ५० टक्के रक्कम भरणेबाबत सवलत देण्यात यावी. तथापि, ५० टक्के रकमेपैकी कामाच्या अंदाजित किंमतीच्या १ टक्का परंतु कमीत कमी रु. १००/- सुरुवातीला वसूल करण्यात यावेत आणि उर्वरित रक्कम त्यांना द्यावयाच्या देयकांतून समप्रमाणात वसूल करण्यात यावी.

३) नोंदणीकृत संस्थेने काम मिळणेबाबतचा अर्ज केल्यानंतर रु. ५ लाखापर्यंतचे एक किंवा ५ लाखापर्यंत एकूण किंमत होईल अशी २-३ कामे विनास्पर्धा विभागीय चालू दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकीय दराने ब-१ करारनाम्यात कामाच्या उपलब्धतेनुसार देण्यात यावे व रु. ५ लक्षपर्यंतचे एक किंवा तेवढया किंमतीची दिलेली कामे यशस्वीपणे पूर्ण केली आहेत अशा संस्थाना त्यापुढे एकूण रु. २५ लक्षपर्यंतची (प्रत्येक काम वर्ग-६ साठीच्या मर्यादेपर्यंत) कामे अशी एकूण रू.३० लक्षच्या मर्यादेपर्यन्त विनास्पर्धा देण्यात यावी. विनास्पर्धा कामे देण्याबाबतची सदर मर्यादा शासनाने वेळोवेळी बदल केल्याप्रमाणे राहील.

४) वरीलप्रमाणे देण्यात आलेल्या कामांच्या अंदाजित किंमतीच्या १० टक्के किंवा रु. ४०,०००/- यापैकी जी रक्कम कमी असेल इतक्या रकमेचे बिनव्याजी अग्रीम संस्थेस देणेत यावे.

**क) कामाचे वाटप : -**

नोंदणीकृत बेरोजगार अभियंत्यांची व नोंदणीकृत बेरोजगार अभियंत्यांच्या सहकारीसंस्थांची ज्येष्ठता यादी स्वतंत्र ठेवावी व नोंदणीकृत बेरोजगार अभियंत्यासाठी

राखून ठेवलेल्या उपलब्ध कामातील १०% कामे बेरोजगार अभियंत्यांच्या सहकारी संस्थांना लॉटरी पध्दतीने वाटप करण्यात यावीत. तथापि, बेरोजगार अभियंत्यांच्या सहकारी संस्था कामे वाटपासाठी उपलब्ध नसतील तर अशी कामे बेरोजगार अभियंतांना लॉटरी पध्दतीने वाटप करण्यात यावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( प्र. य. देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

मा. मुख्यमंत्री ह्यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (सा.बां.)/पाटबंधारे ह्यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (सा.बां.)/पाटबंधारे ह्यांचे खाजगी सचिव,
वित्त विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२, नागपूर,
सचिव (रस्ते)/सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, ह्यांचे स्वीय सहाय्यक,
पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,

प्रत माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी

सर्व मुख्य अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
मुख्य अभियंता, बृहन्मुंबई क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई, महाराष्ट्र,
गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा), मुंबई, महाराष्ट्र,
औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ, (सिडको), निर्मल बिल्डींग, नरीमन पॉइंट, मुंबई, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई, पाटबंधारे विकास महामंडळ, कृष्णा/तापी/गोदावरी/विदर्भ, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई,
आयुक्त, सर्व महानगरपालिका (२ प्रतींसह),
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषदा,
अधीक्षक अभियंता व प्रादेशिक अधिकारी, भूपृष्ठ वाहतूक मंत्रालय, मुंबई,
सर्व अधीक्षक अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ,वरळी, मुंबई/ महानगर पालिका, ठाणे/पुणे/कल्याण
संचालक, उपवने आणि उद्याने, मुंबई,.
प्रतिनियुक्तीवरील सर्व अधिकारी,
सर्व कार्यकारी अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग/जिल्हा परिषद,
सर्व अधिकारी/कार्यासन अधिकारी,सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
कार्यासन इमारती-२, (निवड नस्ती)

---